मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचा-यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार अनिवार्य (पदोन्नतीनंतर व उजळणी) प्रशिक्षणाबाबत सूचना

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः कअप १२१४/प्र.क्र.६५/१४ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १३ मे, २०१५

वाचा

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन -०९/प्र.क्र.३९/०९/१२-अ, दिनांक २३.०९.२०११
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. टीआरएन २०१४/३४२/प्र.क्र.५०/१४/१२-अ, दिनांक २७.०५.२०१४

**परिपत्रक**

राज्य सेवेत सर्व स्तरावर कार्यक्षमता वाढवून गतिमान प्रशासन होण्याकरिता राज्यातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्याच्या हेतूने संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणानुसार सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचा-यांना पदोन्नतीनंतर/उजळणी प्रशिक्षण देण्याची तरतुद केली आहे. त्यानुसार मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासंदर्भात सर्व मंत्रालयीन विभागांना खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत पदोन्नतीनंतर सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचा-यांना गट-अ -दोन आठवडे, गट-ब -दोन आठवडे, गट क - एक आठवडा व गट-ड -तीन दिवस अशा कालावधीकरिता प्रशिक्षण देण्याबाबत संदर्भाधीन क्र. १ च्या शासन निर्णयानुसार विहीत केले आहे. त्याअनुषंगाने मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील पदोन्नती झालेल्या अधिका-यांसाठी प्रशिक्षण संस्थांच्या उपलब्धतेनुसार शासन निश्चित करेल अशा ठिकाणी पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण आयोजित करण्यात येते. याशिवाय आवश्यकतेनुसार उजळणी प्रशिक्षण आयोजित करण्यात येईल. सदरचे प्रशिक्षण राज्य प्रशिक्षण धोरणानुसार देण्यात येत असुन उपस्थिती अनिवार्य आहे.

२. सदर प्रशिक्षण अनिवार्य असल्याने कोणत्याही परिस्थितीत रद्द करता येणे शक्य नाही.

३. सदर प्रशिक्षण पदोन्नतीनंतरचे/ उजळणी प्रशिक्षण असल्यामुळे नामनिर्देशित अधिका-यांऐवजी अन्य कक्ष अधिका-यांस विभागामार्फत परस्पर पाठविण्यात येवू नये.

४. शासन परिपत्रक दि.२७ मे, २०१४ नुसार यापुढे दरवर्षी वेतनवाढ देताना अधिकारी व कर्मचारी यांनी नेमून दिलेले प्रशिक्षण पूर्ण केले किंवा कसे याची पडताळणी होणार आहे.

५. राज्य प्रशिक्षण धोरण शासन निर्णय दिनांक २३.०९.२०११ मधील परिच्छेद ६ नुसार प्रशिक्षणासाठी नामनिर्देशन होऊन सुद्धा अधिकारी गैरहजर राहिल्यास त्याच्याविरूद्ध म.ना.से.(शिस्त व अपील) नियम १९७९ च्या तरतुदीनुसार सक्षम प्राधिका-याकडून शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल. प्रशिक्षणास नामनिर्देशित अधिकारी गैरहजर राहिल्यास प्रशिक्षणाचा खर्च संबंधित व्यक्तीच्या वेतनातून वसुल करण्यात येईल.

६. राज्य प्रशिक्षण धोरणानुसार विहित केलेले पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण पूर्ण केल्याची खातरजमा तदर्थ पदोन्नती नियमित करताना करण्यात येईल. पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण पूर्ण न करणा-यासाठी कर्मचारी/अधिकारी स्वत: जबाबदार असल्याचे आढळून आल्यास त्याला नियमितपणाचे दिनांक/लाभ देण्यात येणार नाही.

७. अपवादात्मक परिस्थितीत नामनिर्देशित प्रशिक्षणार्थीस प्रशिक्षणास उपस्थित राहणे शक्य नसल्यास त्याबाबत विभागाने प्रस्ताव सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. एकवेळची बाब म्हणून परिस्थितीनुरूप सदर प्रस्तावावर प्रकरणपरत्वे निर्णय घेण्यात येईल. तथापि सदर प्रशिक्षण अनिवार्य असल्याने अपरिहार्य परिस्थितीत प्रशिक्षणास अनुपस्थित राहण्यास मान्यता दिलेल्या प्रशिक्षणार्थीस नजिकच्या कालावधीत आयोजित होणा-या प्रशिक्षणास उपस्थित राहणे बंधनकारक राहिल अशा स्वरूपाचे हमीपत्र विभागाने प्रस्तावासोबत सादर करणे आवश्यक राहिल.

८. सर्व मंत्रालयीन विभागांनी प्रस्तुत परिपत्रक त्यांच्या विभागातील अधिकारी/कर्मचा-यांच्या व प्रतिनियुक्तीवर कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१३१४४३१३१५०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Karbhari Jondhale

Digitally signed by Satish Karbhari Jondhale
DN: CN = Satish Karbhari Jondhale, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = GAD
Date: 2015.05.13 14:44:33 +05'30'

**स.का.जोंधळे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. मा.अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रस्ता, पुणे.
४. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना).
५. उप सचिव (का. १४/१४-अ/१२-अ/१८-ब), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. निवडनस्ती